
सेर्गेई अक्साकोव
छोटे शेंदरी फूल

सेर्गेई अक्साकोव

# छोटे शेंदरी फूल

चित्रे : गालिना अनफिलोवा

अनुवाद : अनिल हवालदार



प्रगती प्रकाशन
मॉस्को



कोणा एका राज्यात, कोणा एका प्रदेशात, एक श्रीमंत व्यापारी रहात होता.

त्याच्यापाशी खूप साधने होती. प्रत्येक प्रकारची भरपूर संपत्ती त्याच्यापाशी होती. सोन्या-चांदीचे खजिने होते, मोती आणि मौल्यवान खडे होते, दूर दूरच्या प्रदेशांमधील भारी किंमतीच्या वस्तू होत्या. ह्या व्यापाऱ्याला तीन मुली होत्या. एकीपेक्षा एक सुरेख होती. त्यांच्या सौंदर्याचे शब्दांमध्ये वर्णन करणे अवघड होते. पण सर्वांत धाकटी मुलगी सर्वांत जास्त सुरेख होती.

एके दिवशी हा व्यापारी आपला माल घेऊन सागरप्रवासाला निघाला, वेगवेगळया देशांना जायला निघाला, जगप्रवासाला निघाला. जाण्यापूर्वी त्याने आपल्या मुलींना एकत्र बोलाविले आणि म्हटले :



"माझ्या लाडक्या मुलींनो, माझ्या छान छान बाळींनो, व्यापारासाठी मी समुद्रा-पलिकडं निघालोय. माझ्या गैरहजेरीत नेकीनं आणि गुण्यागोविंदानं रहा. घरी परत येईन तेव्हा तुमच्या इच्छांप्रमाणं तुम्हाला भेटी आणीन. तुम्हाला काय हवं त्याचा विचार करण्यासाठी मी तीन दिवसांची मुदत देतो."

तीन दिवस आणि तीन रात्रीपर्यंत त्या मुलींनी विचार केला. मग त्या आपल्या वडिलांपाशी आल्या आणि प्रत्येकीने आपापली इच्छावस्तू त्यांना सांगितली. सर्वांत मोठ्या मुलीने आपल्या वडिलांना लवून नमस्कार केला आणि ती म्हणाली:

"महाराज, प्रिय तात, मला भरजरी कपडे नकोत, काळ्या सेबलची केसाळ कातडी नकोत, अद्भुत मोती नकोत. माझी तुम्हाला विनंती आहे की, एक रत्नजडित सोनेरी मुकुट माझ्यासाठी घेऊन यावा. तो मुकुट पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणं किंवा तेजस्वी सूर्या-प्रमाणं चमकावा. त्याच्या प्रकाशामुळं अंधाऱ्या रात्रीचं दिवसाच्या उजेडात रूपांतर व्हावं."

त्या प्रामाणिक व्यापाऱ्याने थोडा वेळ विचार केला. मग तो म्हणाला:

"ठीक आहे, माझ्या लाडक्या पोरी. तुला हवा तसाच मुकुट मी तुझ्यासाठी घेऊन येईन. एका राजकन्येचा मालकीचा हा मुकुट आहे. पर्वतामधल्या एका दगडामागं खोलवर असलेल्या दगडी खोलीत तो लपवून ठेवलेला आहे. त्याच्यापर्यंत पोहोचायला तीन लोखंडी दारं ओलांडावी लागतात आणि त्या दारांना तीन जर्मन बनावटीची कुलुपं लावलेली आहेत. हे काम काही सोपं नाही, पण माझ्या संपत्तीपुढं अशक्य काही नाही."

नंतर त्याची दुसरी मुलगी पुढे झाली. तिने आपल्या वडिलांना लवून नमस्कार केला व ती म्हणाली:

"महाराज, प्रिय तात, मला भरजरी कपडे नकोत, काळ्या सेबलची केसाळ कातडी नकोत, अद्भुत मोत्यांची माळ नको, रत्नजडित सोनेरी मुकुटही नको. माझ्यासाठी पूर्वेकडचा बिलोरी आरसा आणा. तो इतका विशुद्ध आणि निर्दोष असावा की, सूर्याखालच्या सर्व गोष्टींचं मी त्यात दर्शन घेऊ शकेन; आणि तो असा असावा की,



जेव्हा जेव्हा मी त्यात स्वतःला पाहीन तेव्हा तेव्हा मी सदा तरुण दिसावं, माझं कुमारिकेचं सौंदर्य जास्त वाढलेलं दिसावं ! "

प्रामाणिक व्यापारी विचारात पडला. खूप वेळ गप्प राहिल्यानंतर तो म्हणाला :

"ठीक आहे लाडक्या पोरी, तुला हवा तसा बिलोरी आरसा मी आणीन. पर्शियाच्या राजाच्या मुलीपाशी असा आरसा आहे. एका पर्वताच्या उंच कड्यावरील दगडी मनोऱ्यात हा आरसा ठेवलेला आहे. त्याच्यापर्यंत जायला सात जर्मन बनावटीची कुलुपं लावलेली सात लोखंडी दारं ओलांडून जायला पाहिजे. मनोऱ्यापर्यंत जायला तीन हजार पायऱ्या चढून गेलं पाहिजे आणि प्रत्येक पायरीवर हातात धारदार तलवार घेऊन एकेक पर्शियन योद्धा रात्रंदिवस जागता पहारा देत आहे. त्या लोखंडी दरवाजांच्या कुलुपांच्या किल्ल्या राजकन्येच्या कमरपट्ट्याभोवती अडकवलेल्या आहेत. पण हा आरसा मला आणून देईल असा एक माणस सागरापलिकडं माझ्या ओळखीचा आहे. ही कामगिरी तुझ्या बहिणीनं सांगितलेल्या कामगिरीपेक्षा अवघड आहे. पण माझ्या संपत्तीपुढं अशक्य काही नाही."

मग सर्वांत धाकटी मुलगी पुढे झाली आणि आपल्या वडिलांना लवून नमस्कार करीत ती म्हणाली :

"महाराज, प्रिय तात, मला भरजरी कपडे नकोत, काळ्या सेबलची केसाळ कातडी नकोत, अद्भुत मोत्यांची माळ नको, रत्नजडित सोनेरी मुकुट नको, बिलोरी आरसा नको मी आपल्यापाशी विनंती करते की, सबंध जगात सर्वांत सुंदर असलेलं छोटं शेंदरी फूल माझ्यासाठी आणावं."

प्रामाणिक व्यापाऱ्याने पूर्वीपेक्षाही जास्त वेळ गंभीरपणे विचार केला. मग आपल्या लाडक्या सर्वांत लहान मुलीला त्याने जवळ घेतले, कुरवाळले, तिचे चुंबन घेतले व तो म्हणाला :

"तू तर तुझ्या बहिणीपेक्षा जास्त अवघड कामगिरी माझ्यावर टाकलीस. माणसाला काय हवं हे माहीत असलं म्हणजे त्याला ते नक्की सापडतं. पण जे त्याला माहीतच नाही ते तो कसं शोधणार? शेंदरी फुलं शोधणं अवघड नाही, पण सबंध जगात अमूकच



शेंदरी फूल सर्वांत सुंदर आहे हे मला कसं समजणार? मी माझ्याकडून प्रयत्नांची शर्थ करीन, पण तुझी इच्छा पुरी करू शकलो नाही तर माझ्यावर रागावू नकोस."

अशा रीतीने सागरापलिकडील देशांमध्ये, निरनिराळ्या राज्यांमध्ये व्यापार करण्यासाठी प्रामाणिक व्यापारी निघाला. आपल्या सर्वांत मोठ्या मुलीसाठी त्याने रत्नजडित सोनेरी मुकुट हस्तगत केला. त्या मुकुटाच्या रत्नांच्या तेजामुळे रात्रीच्या अंधाराचे दिवसाच्या उजेडात रूपांतर घडत होते. आपल्या दुसऱ्या मुलीसाठी त्याने बिलोरी आरसाही मिळविला. त्या आरशात सूर्याखालील सर्व सौंदर्याचे दर्शन घडत होते आणि जी मुलगी त्या आरशात स्वतःला पाहील ती कधीही म्हातारी होत नव्हती, उलट अधिकच तरुण बनत होती. पण आपल्या सर्वांत लहान आणि लाडक्या मुलीसाठी मात्र त्याला भेटवस्तू सापडेना. सबंध जगात सर्वांत सुंदर असे छोटे शेंदरी फूल त्याला कुठेही आढळेना.

झारांच्या, राजांच्या, सुलतानांच्या वेगवेगळ्या बागांमधून तो हिंडला. गोष्टींमधून आणि शब्दांमधून ज्यांच्या सौंदर्याचे वर्णन करता येणार नाहीत अशी अनेक शेंदरी फुले त्याने पाहिली. पण अमूक एक फूल जगात सर्वांत सुंदर आहे अशी खात्री मात्र त्याला कुणीही देईना किंवा त्याला स्वतःलाही तशी खात्री वाटेना. भुळभुळत्या वाळवंटांमधून आणि दाट जंगलांमधून तो आपल्या विश्वासू नोकरांबरोबर प्रवास करीत चालला होता. अचानक त्यांच्यावर दरोडेखोरांनी हल्ला चढविला. तेव्हा त्या प्रामाणिक व्यापाऱ्याने आपला मौल्यवान काफला आणि निष्ठावंत नोकर यांना टाकले व तो दाट जंगलात पळाला. त्याने मनाशी विचार केला: "ह्या रानटी दरोडेखोरांच्या तावडीत सापडून आयुष्यभर त्यांचा बंदिवान गुलाम म्हणून राहण्यापेक्षा जंगली जनावरांनी मला फाडून खाल्ले तर ते जास्त चांगले!"

दाट जंगलांमधून, निबिड अरण्यांमधून तो भरकटत चालला होता. जेवढा तो दूर जात होता तेवढी त्याची वाट सोपी बनत होती. त्याला पुढे वाट करून देण्यासाठी झाडे आणि दाट झडपे बाजूला सरकत होती. पण तरीही, जेव्हा तो मागे वळून पाही तेव्हा



हातसुद्धा ताठ करता येणार नाही एवढे दाट जंगल पाठीशी उभे असे. त्या प्रामाणिक व्यापाऱ्याला आश्चर्य वाटले. आपल्यावर कोणते नवल घडते आहे हे त्याला उमजेना. पहाटेपासून संध्याकाळपर्यंत तो चालत होता. भोवती अंधार दाटला तरी त्याच्या पायांखाली उजेड पडत होता. तो असाच मध्यरात्रीपर्यंत चालत राहिला. आणि त्याला समोर झगझगीत प्रकाश दिसला. पण आग लागल्यानंतर होणारा गोंधळ अगर कडकड पेटल्याचे आवाज काही त्याला ऐकू येईनात. शेवटी तो एक मोकळ्या मैदानात आला. समोरचे दृश्य बघून तो थक्क झाला. त्या मैदानात एक भव्य राजवाडा उभा होता. सोन्या-रुप्याने मढलेला आणि रत्नांनी जडलेला तो राजवाडा नुसता झगमगत होता. तो राजवाडा पेटल्यासारखा भास होत होता, पण आग मात्र दिसत नव्हती. राजवाड्याच्या सर्व खिडक्या सताड उघड्या होत्या आणि त्यामधून जे संगीत ऐकू येत होते तसे संगीत त्या व्यापाऱ्याने यापूर्वी कधीही ऐकले नव्हते.

किरमिजी गालिचा अंथरलेल्या आणि मुलामेदार कठड्यांच्या पायऱ्यांवरून त्याने राजवाड्यात प्रवेश केला. प्रथम तो एका दालनात गेला—तेथे कुणी नाही. दुसऱ्या दालनात गेला—तेथेही कुणी नाही. अशी त्याने दहा दालने पार केली, पण त्याला कुणीही आढळले नाही. मात्र सर्वत्र राजेशाही वैभव—यापूर्वी कधीही न पाहिलेले. सोने, रुपे, पौर्वात्य बिलोरी आरसे, हस्तीदंती सामान.

अशी अफाट संपत्ती पाहून तो प्रामाणिक व्यापारी चकित झाला. पण त्याहूनही त्याला आश्चर्य वाटले की, त्या राजवाड्याचा मालक त्याला आढळत नव्हता, नोकर-चाकरही दिसत नव्हते. पण तरीही वातावरणात संगीत भरले होते. व्यापारी स्वत:शी म्हणाला: "हे सारं आहे छान, पण खायला मात्र काहीही नाही."

हे शब्द तो बोलला न बोलला तोच त्याच्या डोळ्यांदेखत सोन्या-चांदीच्या भांड्यांनी भरलेले एक टेबल उभे झाले. त्या भांड्यांमध्ये मिष्टान्ने भरलेली होती, सुंदर विदेशी मद्ये होती, मध-पाण्यापासून बनविलेली दारू होती. तो टेबलाशी बसला आणि त्याने पोटभर खाल्ले, तो पोटभर प्यायला. कारण सबंध दिवसभर त्याने काहीही खाल्लेले



होते. अन्न एवढे चवदार होते की, शब्दात वर्णन करणे अशक्य. ते नुसते पाहून माणसाच्या तोंडाला पाणी सुटले असते. त्या टेबलापासून तो उठतो न उठतो तोच ते टेबल व त्यावरील सर्व वस्तू एकदम नाहीशा झाल्या. पण हा सारा वेळ ते संगीत मात्र अखंड चालू होते.

ह्या अद्भुतांचे आणि चमत्कारांचे नवल करीत तो व्यापारी राजवाड्याच्या दालनां-मधून फिरू लागला. त्याच्या मनात विचार आला: "आता घटकाभर झोपायला मिळालं तर किती छान होईल!"

आणि काय आश्चर्य! त्याच्यासमोर एक सुंदर, कलाकुसर केलेला, शुद्ध सोन्याचा पलंग उभा राहिला. त्या पलंगाला बिलोरी काचेचे पाय होते, त्याच्या चांदीच्या छताला सोन्याची किनार होती. त्या पलंगावर हंसांच्या मऊ मऊ पिसांची प्रचंड गादी होती.

ह्या नव्या चमत्कारामुळे तो व्यापारी आणखीच थक्क झाला. त्या उंच पलंगावर तो आडवा झाला. त्याने डोक्यावर छत ओढून घेतले. ते रेशमासारखे मऊ आणि सुरेख होते. दालनात संध्याप्रकाश पसरला. संगीत हळूहळू विरत गेले. व्यापारी स्वत:शी म्हणाला: "नुसत्या स्वप्नात जरी मी माझ्या मुलींना पाहू शकलो तर किती छान होईल!" दुसऱ्याच क्षणी त्याला गाढ झोप लागली.

व्यापाऱ्याला जाग आली तेव्हा सूर्य सर्वांत उंच झाडांपेक्षाही वर चढला होता. सर्व रात्रभर व्यापाऱ्याने स्वप्नांमध्ये आपल्या मुलींना पाहिले होते. त्याची सर्वांत मोठी आणि दुसऱ्या क्रमांकाची, अशा दोन्ही मुली मजेत असलेल्या त्याला दिसल्या होत्या. पण त्याची सर्वांत लाडकी धाकटी मुलगी मात्र दु:खी-कष्टी दिसत होती. पहिल्या दोन मुलींना श्रीमंत नवरे लाभले होते आणि आपल्या वडिलांच्या परतण्याची वाटही न पाहता त्या लग्न करायला निघाल्या होत्या. पण सर्वांत धाकटी मात्र कुणाही पुरुषाला दाद देत नव्हती. आपल्या प्रिय वडिलांच्या घरी परतण्यापर्यंत लग्नाचा निर्णय घेण्याची तिची मुळीच इच्छा नव्हती. व्यापाऱ्याला खूप आनंद झाला आणि खूप दु:खही झाले.



बिछान्यावरून तो खाली उतरला तेव्हा त्याच्यासाठी पोषाख तयार ठेवलेला त्याला आढळला. एका बिलोरी काचपात्रात पाण्याचे छोटे कारंजे उडत होते. त्याने तोंड धुतले आणि कपडे केले. आता दर नव्या चमत्काराचे त्याला आश्चर्य वाटेनासे झाले. टेबलावर चहा-कॉफी व मेवा-मिठाई आली. त्याने देवाचे आभार मानून पोटभर खाल्ले व तो पुन्हा राजवाडा पहायला निघाला. सोनेरी सूर्यप्रकाशात तो राजवाडा अधिकच सुंदर दिसत होता.

यावेळी तो दुसऱ्या जिन्यावरून निघाला. हा जिना हिरव्या संगमरवराचा आणि तांबूस मॅलकाईटचा होता. जिन्यावरून तो थेट हिरव्यागार बागेत उतरला. तेथे झाडे पिकल्या फळांनी लगडलेली होती. त्या फळांना पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटले. बागेमध्ये वेगवेगळ्या रंगांची आणि सुवासांची सुंदर सुंदर फुलेही फुलली होती. चित्रविचित्र पक्षी उड्या मारीत होते, गाणी गात होते. पाण्याची कारंजी एवढी उंच उडत होती की त्यांचे शेंडे पहायला मान थेट पाठीला टेकवावी लागत होती. बिलोरी काचेच्या वाटांमधून स्फटिकासारख्या पाण्याचे झरे खळखळ वहात होते.

अचानक त्याला एका गवती टेकाडावर एक शेंदरी रंगाचे फूल दिसले. त्या फुलाच्या सौंदर्याचे वर्णन शब्दात करणे अगर लेखणीने लिहिणे शक्य नव्हते. त्या व्यापाऱ्याच्या काळजाचा ठोका चुकला. तो त्या फुलाच्या अधिक जवळ सरकला. एखाद्या सुगंधी प्रवाहाप्रमाणे त्या फुलाचा गंध बागेत दरवळला होता. व्यापाऱ्याचे हात-पाय थरथरले व तो आनंदाने ओरडला :

"जगात ज्याच्या सौंदर्याला तोड नाही असं हेच ते छोटं शेंदरी फूल! माझ्या लाडक्या धाकट्या मुलीनं मला आणायला सांगितलेलं हेच ते फूल!"

एवढे बोलून तो व्यापारी त्या फुलापाशी गेला आणि त्याने ते छोटे शेंदरी फूल तोडले. त्याच क्षणाला अचानक काळे मेघ दाटून आले, विजा कडकडल्या आणि त्याच्या पायांखालची जमीन हादरून निघाली. जमिनीमधून राक्षसासारखा एक महाभयानक प्राणी वर आला व व्यापाऱ्यासमोर उभा राहिला. तो ना धड जनावर होता ना धड माणूस!



त्याच्या अंगावर केस होते आणि त्याला पाहताच छातीत धडकी भरत होती. तो राक्षस कर्कश्य जंगली आवाजात ओरडला :

"माझ्या बागेतलं माझं सर्वांत लाडकं छोटं फूल तोडायची तुझी हिंमत कशी झाली? तळहातावरच्या फोडाप्रमाणं मी त्या फुलाला जपलं होतं! रोज त्याला बघणं हा माझा आनंद होता. माझ्या आयुष्यामधला सगळा आनंद तू आता हिरावून घेतला आहेस. मी तुझं लाडक्या, आदरणीय पाहुण्याप्रमाणं स्वागत केलं. तुला खाऊ-पिऊ घातलं, विश्रांती दिली. आणि माझ्या चांगुलपणाची तू अशी परतफेड केलीस? आता भोग आपल्या कर्माची फळं! तुझ्या गुन्ह्याबद्दल तुला अकाली मरावं लागणार!"

सगळ्या बाजूंनी जंगली आरोळ्या उमटू लागल्या :

"तुझ्या गुन्ह्यासाठी तुला अकाली मरावं लागणार!"

त्या महाभयानक राक्षसासमोर व्यापाऱ्याने गुडघे टेकले आणि विनवणीच्या सुरात तो म्हणाला :

"हे भल्या माणसा, जंगलच्या प्राण्या, सागरात वसती करणाऱ्या, तुला कोणत्या नांवानं हाक मारायची ते मला माहीत नाही, तुला काय म्हणायचं ते मला सांगता येणार नाही. माझ्या निष्पाप धारिष्टयाबद्दल माझ्या धर्मशील आत्म्याला नष्ट करू नको; माझा तुकडे तुकडे करून वध करण्याची शिक्षा देऊ नको. तुझी विनवणी करण्याची मला संधी दे. मला तीन सुंदर, तरुण मुली आहेत प्रत्येकीला प्रत्येकीच्या इच्छेप्रमाणं भेटवस्तू आणायचं मी वचन दिलं होतं. मोठीला रत्नजडित सोनेरी मुकुट, मधलीला बिलोरी आरसा आणि सर्वांत धाकटीला जगातलं सर्वांत सुंदर असं लहान शेंदरी फूल. माझ्या पहिल्या दोन मुलींसाठी मला भेटवस्तू मिळाल्या, पण धाकटीसाठी मात्र काही केल्या कुठेही काहीच सापडेना. मग ह्या बागेत ते जगातलं सर्वांत सुंदर छोटं शेंदरी फूल माझ्या दृष्टीला पडलं आणि मला वाटलं की, ह्या बागेचा, ह्या राजवाड्याचा एवढा श्रीमंत मालक, माझ्या धाकट्या मुलीसाठी मी एक छोटं शेंदरी फूल तोडलं म्हणून रागावणार नाही. तुझ्यासमोर मी माझा गुन्हा कबूल करतो. मला क्षमा कर. मी मूर्खासारखा वागलो. माझ्या



लाडक्या मुलींपाशी मला परत जाऊं दे. माझ्या लाडक्या धाकट्या मुलीसाठी हे छोटं शेंदरी फूल मला घेऊन जाऊं दे. त्या बदल्यात तू मागशील तेवढं सोनं मी तुला देतो."

जंगलामधून प्रचंड हास्य दणाणले. जणू आकाशात वीज कडाडल्याचा भास झाला. तो जंगलचा प्राणी, सागरातील निवासी व्यापाऱ्याला म्हणाला:

"मला तुझं सोनं नको; माझं स्वतःचंच सोनं ठेवायला माझ्यापाशी जागा नाही. जीव वाचवण्याचा एकच मार्ग तुझ्यापाशी आहे. तुला काहीही इजा न करता तुझ्या घरी जाऊ देईन, तुला प्रचंड संपत्ती बक्षीस देईन, छोटं शेंदरी फूल तुला नेऊ देईन; पण प्रामाणिक व्यापारी म्हणून तू मला वचन दिलं पाहिजेस की, तुझ्या ऐवजी तुझी एक मुलगी तू इथं पाठवून देशील. इथं तिला काहीही अपाय होणार नाही. इथं ती मानानं आणि स्वतंत्रपणं राहील. जसा तू माझ्या राजवाड्यात राहिलास. मी इथं एकटा राहतोय आणि मला कुणीतरी जोडीदार असावासा वाटतो."

"भल्या माणसा, जंगलच्या प्राण्या, सागरात वसती करणाऱ्या, माझ्या मुली स्वखुषीनं नाही आल्या तर काय करायचं? त्यांचे हात-पाय बांधून बळजबरीनं त्यांना पाठवून देऊ? तुझ्यापर्यंत त्यांनी कोणत्या मार्गानं यायचं? इथपर्यंत पोचायला मला दोन वर्षं लागली. कोणकोणत्या रस्त्यांनी आलो, कोणकोणती ठिकाणं पार केली, ते मलाच ठाऊक नाही."

तो जंगलचा प्राणी, सागरातील निवासी व्यापाऱ्याला उत्तरला:

"मला इथं कैदी कुमारिका नकोय. तुझ्या प्रेमाखातर, तुझी मुलगी स्वतःच्या इच्छेनं इथं येऊं दे. आणि जर तुझ्या मुली स्वेच्छेनं इथं यायला तयार झाल्या नाहीत तर तू स्वतः परत आलं पाहिजेस आणि कठोर मृत्यूला स्वीकारलं पाहिजेस. इथपर्यंतचा प्रवास कसा करायचा त्याची काळजी तू करू नकोस. ही माझी अंगठी मी तुला देतो. ही अंगठी आपल्या बोटात घालणारी व्यक्ती इच्छा करील त्या ठिकाणी क्षणार्धात जाऊन पोहोचेल. तुला तीन दिवस आणि तीन रात्रींपर्यंत घरी राहण्याची मी परवानगी देतो."

व्यापाऱ्याने खूप खूप विचार केला आणि शेवटी मनाशी ठरविले:



"माझ्या मुलींना भेटून घेतो, त्यांना माझे आशीर्वाद देतो आणि मृत्यूपासून मला वाचवायला जर त्या तयार नसल्या तर खऱ्या धर्मनिष्ठाप्रमाणं मृत्यूशी भेटायला मी सज्ज झालं पाहिजे. ह्या जंगलच्या प्राण्याकडं, सागरनिवासीकडं परतलं पाहिजे." फसविण्याचे विचार त्याच्या मनात नव्हते. तो आपले विचार मोठ्यांदा बोलला नाही तरी जंगलच्या प्राण्याने, सागरनिवासीने त्याचे विचार अंतर्ज्ञानाने ओळखले. हा माणूस प्रामाणिक आहे हे जाणून त्याने सोन्याची अंगठी आपल्या बोटामधून काढली आणि व्यापाऱ्याच्या हाती दिली.

व्यापाऱ्याने आपल्या बोटात अंगठी घातली न घातली तोच दुसऱ्याच क्षणी तो स्वतःच्या प्रशस्त आवाराच्या दाराशी उभा असल्याचे त्याला आढळले. त्याच्या पाठोपाठ त्याचे प्रामाणिक सेवक मौल्यवान वस्तूंनी भरलेले काफले घेऊन हजर झाले. घरात एकच धांदल माजली. मुलींनी आपल्या बापाची भराभरा चुंबने घेतली. मोठ्या दोघीजणी बापाशी जरा जास्तच लाडीगोडी लावीत होत्या. पण त्या सगळ्या आनंदात काहीतरी उणीव असल्याचे त्यांना जाणवले. आपले वडील मनात दुःखी असल्याचे त्यांना जाणवले. आपल्या वडिलांनी खूप मोठी संपत्ती गमावली तर नाही ना, असे मोठ्या दोघींनी विचारले. पण छोटीच्या मनात वडिलांच्या संपत्तीविषयी विचारही आला नाही. ती बापाला म्हणाली :

"तुमच्या संपत्तीचं मला महत्त्व नाही. श्रीमंती पुन्हा मिळवता येते. पण तुमच्या अंतःकरणात कोणतं दुःख सलतंय ते मला सांगा."

व्यापारी आपल्या गुणी, आवडत्या मुलींना म्हणाला :

"मी संपत्ती मुळीच गमावली नाही. उलट तिप्पट-चौपट कमावून आलोय. माझ्या काळजात दुसरंच एक दुःख आहे. ते मी उद्या तुम्हाला सांगीन. पण आजचा दिवस आपण खूप आनंदात घालवू या."

आपल्या लोखंडी पेट्या आत आणण्याची त्याने आज्ञा केली. सर्वांत मोठ्या मुलीला त्याने रत्नजडित सोनेरी मुकुट दिला. दुसरीला त्याने बिलोरी आरसा दिला. आणि सर्वांत



धाकटीला सुवर्णपात्रात ठेवलेले लहान शेंदरी फूल दिले. मोठ्या दोघीजणी आनंदाने नाचू लागल्या. पण धाकटी मात्र ते छोटे शेंदरी फूल पाहून थरथर कापू लागली. तिच्या डोळयांमधून आसवांच्या धारा वाहू लागल्या.

संध्याकाळच्या सुमारास पाहुणे यायला आरंभ झाला. व्यापाऱ्याचे घर मित्रमंडळींनी आणि नातेवाईकांनी भरून गेले. मध्यरात्रीपर्यंत मेजवानी चालू होती. आपल्या घरात एवढी सुंदर मैफल भरल्याचे व्यापाऱ्याने यापूर्वी कधी पाहिले नव्हते. एवढी सुंदर सुंदर सुवर्णाची आणि रूप्याची भांडी घरात कोठून आली याचे सर्वांना आश्चर्य वाटत तर होतेच, पण खुद्द व्यापाऱ्यालाही आश्चर्य वाटत होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी व्यापाऱ्याने आपल्या सर्वांत मोठ्या मुलीला बोलाविले. त्याने तिला सगळी हकीकत सांगितली व जंगलच्या प्राण्याबरोबर, सागरनिवासीबरोबर ती राहील अथवा नाही, असे विचारले. पण तिने स्पष्ट नकार दिला आणि ती म्हणाली:

"ज्या मुलीनं छोटं शेंदरी फूल मागितलं होतं तिनंच जावं आणि वडिलांचा जीव वाचवावा!"

तेव्हा त्या व्यापाऱ्याने आपल्या दुसऱ्या मुलीला बोलाविले. तिला सर्व हकीकत त्याने सांगितली आणि आपल्याला मरणापासून वाचविण्यासाठी ती त्या जंगलच्या प्राण्याकडे, त्या सागरनिवासीकडे जाऊन रहायला तयार आहे का, असे विचारले. पण दुसऱ्या मुलीनेही नकार दिला. ती म्हणाली:

"ज्या मुलीनं छोटं शेंदरी फूल मागितलं होतं, तिनंच जावं आणि वडिलांचा जीव वाचवावा!"

मग व्यापाऱ्याने आपल्या सर्वांत लहान मुलीला बोलाविले. आरंभापासून अखेरपर्यंतची सर्व हकीकत त्याने तिला सांगितली. पण त्याने आपले बोलणे संपविण्याच्या आधीच तिने बापासमोर गुडघे टेकले व ती म्हणाली:

"महाराज, प्रिय तात, त्या जंगलच्या प्राण्याकडं, त्या सागरनिवासीकडं, मी जाते रहायला! माझ्यासाठी तुम्ही छोटं शेंदरी फूल आणलंत. आता तुमची सुटका करणं हे माझं कर्तव्य आहे."



नवल करीत ती बराच वेळपर्यंत फिरत होती. ती दालने एकाहून एक अधिक सरस होती. मग सुवर्णपात्रासह ते छोटे शेंदरी फूल तिने बरोबर घेतले आणि हिरव्यागार बागांमध्ये ती गेली. तेथे पक्षी स्वर्गीय गाणी गात होते. झाडे, झुडुपे आणि फुले आपले हात हलवून तिचे स्वागत करीत होती, तिच्यासमोर झुकून तिला अभिवादन करीत होती. पाण्याची कारंजी अधिक उंच उडत होती. ती जवळ येताच निर्मळ झऱ्यांची खळखळ जास्त जोराने ऐकू येऊ लागली. शेवटी त्या गवताळ उंचवटयाच्या ठिकाणी ती आली. प्रामाणिक व्यापाऱ्याने येथूनच ते जगातील सर्वांत सुंदर छोटे शेंदरी फूल खुडून नेले होते. त्या फुलाला पूर्वीच्या जागी परत ठेवण्याच्या हेतूने तिने सुवर्णपात्रामधून फूल बाहेर काढले तो काय! अचानक ते फूल तिच्या हातामधून उडाले व स्वतःच पूर्वीच्या देठावर जाऊन बसले. आता ते पूर्वीपेक्षाही जास्त सुंदर दिसू लागले.

त्या अत्यंत अद्भुत चमत्काराचे तिला खूप खूप नवल वाटले. पण आपले आवडते छोटे शेंदरी फूल परत आपल्या जागी गेले याचा तिला आनंद झाला. ती राजवाड्यात परत गेली. तेथे एका दालनात एक टेबल तिच्यासाठी सज्ज होते. तिच्या मनात आले: "जंगलचा प्राणी, सागरनिवासी, माझ्यावर रागावलेला दिसत नाही. उलट तो उदार मालक दिसतोय!"

हा विचार तिच्या मनात आला न आला तोच समोरच्या पांढऱ्याशुभ्र संगमरवरी भिंतीवर आगीची अक्षरे उमटली:

"मी तुझा मालक नाही, तर तुझा आज्ञाधारक दास आहे. तू माझी मालकीण आहेस. तुझी प्रत्येक इच्छा, प्रत्येक आज्ञा, मी आनंदानं पूर्ण करीन."

आगीची अक्षरे तिने वाचताच क्षणार्धात ती संगमरवरी भिंतीवरून नाहीशी झाली. मग तिच्या मनात विचार आला की, एक पत्र लिहून आपल्या वडिलांना कुशल कळवावे. हा विचार मनात यायचा अवकाश, एक सोनेरी लेखणी, एक शाईदान आणि कागद तिच्यासमोर हजर! तिने आपल्या लाडक्या वडिलांना व बहिणींना पत्र लिहिले:



"माझ्यासाठी रडू नका, दु:ख करू नका. कारण जंगली प्राण्याच्या, सागरनिवासीच्या राजवाड्यात मी एखाद्या राजकन्येप्रमाणे राहते आहे. मी त्याला पहात नाही किंवा त्याचा आवाजही ऐकत नाही. पण पांढऱ्या संगमरवरी भिंतीवर तो माझ्यासाठी आगीची अक्षरे लिहितो. माझा प्रत्येक विचार त्याला माहीत होतो आणि ताबडतोब तो माझी प्रत्येक इच्छा पुरी करतो. तो मला त्याची मालकीण म्हणतो आणि मी त्याला मालक म्हणावं असं त्याला वाटत नाही."

तिने हे पत्र लिहून पुरे केले न केले तोच पत्र तिच्या हातांमधून नाहीसे झाले. जणू काही ते तेथे कधी नव्हतेच. संगीत पूर्वीपेक्षाही अधिक मधुर वाजू लागले. टेबलावरील सोन्याच्या पात्रांमध्ये मेवामिठाई आणि मधुर पेये भरलेली दिसू लागली. आयुष्यात यापूर्वी कधीही तिने एकटीने भोजन घेतले नव्हते. पण आता ती आनंदाने टेबलाशी बसली व पोटभर खायली-प्यायली. ती जेवत असताना मधुर संगीत वाजतच होते. नंतर ती पुन्हा बागांमध्ये फिरायला निघाली, कारण दुपारच्या भोजनापूर्वी अर्ध्या बागासुद्धा ती पाहू शकली नव्हती. सगळी झाडे, झुडुपे आणि फुले तिच्यासमोर झुकत होती. तऱ्हतऱ्हेची रसाळ फळे स्वत:च तिच्या तोंडात येऊन पडली. असा बराच वेळ लोटला. संध्याकाळ झाली. ती आपल्या उंच दालनात परत आली तो काय! टेबलावर मेवामिठाई, मधुर पेये तयार!

रात्रीच्या जेवणानंतर ती पांढऱ्या संगमरवरी भिंतीपाशी गेली. ह्याच भिंतीवर तिने आगीची अक्षरे वाचली होती. पुन्हा त्या भिंतीवर आगीची अक्षरे उमटली:

"माझी मालकीण, तिच्या बागांवर आणि दालनांवर, एकूण पाहुणचारावर आणि सेवेवर खूष आहे ना?"

व्यापाऱ्याची तरुण, सुंदर मुलगी आनंदाने उत्तरली:

"मला मालकीण म्हणू नको. तूच माझा दयाळू, प्रेमळ मालक रहा. तुझी आज्ञा मी कधीही मोडणार नाही. तुझ्या पाहुणचाराबद्दल मनापासून आभार मानते. एवढी उंच भव्य दालनं आणि एवढ्या सुंदर बागा सबंध जगात कुठंही नाहीत. मी का बरं खूष



असू नये? अशा अद्भुत गोष्टी आयुष्यात मी कधीही पाहिल्या नाहीत. हे सर्व खरं आहे यावर माझा अजून विश्वास बसत नाही. पण एक गोष्ट आहे. मला एकटीला झोपायला भीती वाटते. तुझ्या सर्व दालनांमध्ये माझ्याशिवाय दुसरं कुणीही नाही."

संगमरवरी भिंतीवर आगीची अक्षरे उमटली:

"माझ्या सुंदर मालकिणी, घाबरू नको. तू इथं एकटी झोपणार नाहीस. तुझी विश्वासू प्रामाणिक दासी तुझ्या सेवेला इथं हजर आहे. ह्या दालनांमध्ये अनेक माणसं वावरत आहेत. फक्त तू त्यांना पाहू शकत नाहीस, अथवा त्यांचं बोलणं ऐकू शकत नाहीस. पण माझ्याप्रमाणंच तीसुद्धा रात्रंदिवस तुझी राखण करीत आहेत."

व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी आपल्या शय्यादालनात गेली. तेथे खरोखरीच तिची नेहमीची विश्वासू दासी उभी होती. ती दासी भीतीने अर्धमेली झाली होती, पण आपल्या मालकिणीला पाहताच तिला खूप आनंद झाला. आपल्या मालकिणीच्या गुलाबी हाता-पायांची तिने चुंबने घेतली. तिला पाहून व्यापाऱ्याच्या मुलीलाही आनंद झाला. आपल्या प्रिय वडिलांची, बहिणींची, घरातील सर्व नोकर-चाकरांची तिने आस्थेने चौकशी केली. मग तिने आपल्या साहसांची कथा दासीला सांगितली. अशा रीतीने पहाट फुटेपर्यंत ही जोडी न झोपता गप्पा मारीत राहिली.

अशा रीतीने व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी तिच्या नव्या घरात राहू लागली. दररोज तिच्या समोर नवनवे भारी पोषाख ठेवले जात. त्यांच्या अमूल्य सौंदर्याचे वर्णन शब्दांनी वा लेखणीने करणे शक्य नाही. दररोज वेगवेगळ्या करमणुकी आणि नवनवे कार्यक्रम. कधी दाट जंगलांमधून घोडागाडीमधून रपेट. मात्र घोडे नाहीत. मधुर संगीत साथीला. झाडे तिच्या गाडीला स्वतःच बाजूला होऊन वाट करून देत. कलाकुसरीच्या वस्तू बनविण्यात आणि विणकाम करण्यात ती आपला वेळ घालवू लागली. सोनेरी-रुपेरी काड्या तिने वस्त्रांमध्ये विणल्या. मोत्यांच्या झालरी लावल्या. आपल्या प्रिय वडिलांना तिने भेटी पाठवायला सुरुवात केली. पण सर्वांत मोठा आणि सर्वांत सुंदर रुमाल जंगलच्या प्राण्याला, सागरनिवासीला, आपल्या प्रेमळ धन्याला तिने भेट दिला. दिवस जसजसे



उलटू लागले, तसतशी ती संगमरवरी भिंतीपाशी जास्त जास्त धावू लागली. आपल्या उदार धन्यासमोर कृतज्ञतेचे शब्द बोलू लागली. त्याची उत्तरादाखल उमटलेली आगीची अक्षरे वाचू लागली.

अशा रीतीने काळ उलटला. एखादे कृत्य प्रत्यक्ष करताना जेवढा वेळ लागतो त्यापेक्षा त्याची गोष्ट खूप लौकर सांगता येते. व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी आपल्या नव्या जीवनात आणि घरात चांगलीच रमली होती. आता तिला कसलेही आश्चर्य वाटत नव्हते, अथवा कशाचीही भीती वाटत नव्हती. आपल्या उमद्या मालकाचा तिला दर दिवशी जास्तच लळा लागत चालला होता. तो तिच्यावर स्वतःपेक्षाही जास्त प्रेम करीत होता हे ती पहात होती. केवळ शब्दांपुरते त्याने तिला मालकीण म्हटले नव्हते. संगमरवरी भिंतीपाशी न जाता, आगीची अक्षरे न वाचता, त्याच्याशी बोलता यावे, त्याचा आवाज ऐकू यावा, म्हणून ती तळमळू लागली.

ती विनवू लागली, प्रार्थना करू लागली. पण तिच्या ह्या विनवण्यांना जंगलचा प्राणी, सागरनिवासी सुरुवातीला बधेना. आपला आवाज तिची धडकी भरवील अशी त्याला भीती वाटत होती. पण तिच्या काकुळतीच्या विनवण्या चालूच राहिल्या. आता यापुढे नकार देणे त्याला अशक्य ठरले. अखेरीस संगमरवरी भिंतीवर त्याने शेवटच्या वेळेस आगीची अक्षरे लिहिली :

"आज बागेत ये, वेली-पल्लवांनी बहरलेल्या तुझ्या नेहमीच्या आवडत्या जागी बैस आणि म्हण : 'माझ्या विश्वासू दासा, बोल!'"

मुळीच उशीर न लावता व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी बागेत धावली. आपल्या नेहमीच्या आवडत्या लताकुंजात बसली आणि म्हणाली :

"माझ्या दयाळू, प्रेमळ मालका, तुझ्या आवाजानं मी घाबरीन म्हणून भिऊ नकोस. तुझ्या एवढ्या प्रेमळ वागण्यानंतर तुझ्या पशुगर्जनेला मी मुळीच घाबरणार नाही. न भिता बोल माझ्याशी!"

लताकुंजामागे कुणीतरी प्रचंड रानटी, फिस्कारल्या भयंकर आवाजात सुस्कारा



टाकल्यांचे तिने ऐकले. खरे म्हणजे त्या प्राण्याने हा केवळ अस्पष्ट आवाज केला होता. आरंभी व्यापाऱ्याची मुलगी ह्या आवाजाला दचकली. पण तरीही तिने आपल्या भीतीवर ताबा मिळविला. आपण घाबरलो आहोत असे तिने मुळीच दाखविले नाही. हळूहळू तिला त्याचे दयाळू, स्वागतपर शब्द ऐकू येऊ लागले. त्याचे शहाणे विचार ऐकताना तिला खूप आनंद होऊ लागला.

त्या घटकेपासून ती दोघे सतत बोलत होती. जवळ जवळ सबंध दिवसभर त्यांचे संभाषण चालले होते. बागेतून फिरताना, जंगलामधून गाडीतून रपेट करताना, राजवाड्यामधील दालनात विश्रांती घेत असताना, ती सतत त्याच्याशी बोलत होती. व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण मुलीने नुसते विचारण्याचा अवकाश :

"माझ्या प्रेमळ, आवडत्या धन्या, तू इथं आहेस का?"

जंगलचा प्राणी, सागरनिवासी, तात्काळ उत्तर द्यायचा :

"माझ्या सुंदर मालकिणी, तुझा हा विश्वासू दास, तुझा चिरंतन मित्र, इथंच आहे."

त्याचा जंगली, भयानक आवाज ऐकून इतःपर तिला भीती वाटेनाशी झाली. त्यांच्यामध्ये अखंड प्रेमळ संवाद सुरू झाले.

असा किती काळ गेला कुणास ठाऊक! पण व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण मुलीला आता खूप खूप इच्छा होऊ लागली की, जंगलच्या प्राण्याला, सागरनिवासीला, आपल्या स्वतःच्या डोळ्यांनी पहावे. त्याप्रमाणे ती त्याची मनधरणी करू लागली. ती आपल्याला पाहून घाबरेल ह्या धास्तीने बराच काळपर्यंत तो तिच्या विनंत्या कबूल करीत नव्हता. कारण तो खरोखरीच भयानक होता. त्याच्या कुरुपतेचे वर्णन करण्यास शब्द अपुरे होते, लेखणी असमर्थ होती. तो जंगलचा प्राणी, तो सागरनिवासी, व्यापाऱ्याच्या मुलीला म्हणाला :

"हे माझ्या सुंदर, नयनरम्य मालकिणी, माझा महाभयानक चेहरा आणि ओंगळ शरीर दाखवण्याची विनंती कृपया करू नकोस. माझ्या आवाजाची आता तुला सवय झालीय. आपण शांततेनं आणि गुण्यागोविंदानं एकत्र रहात आहोत. क्वचितच आपण



एकमेकांपासून वेगळे असतो. माझ्या तुझ्यावरल्या मूक प्रेमावर तू प्रेम करतेस. जसा मी भयानक आणि ओंगळ आहे तसा तू मला पाहिलंस, तर तू माझा तिटकारा करू लागशील. मला अभाग्याला स्वतःच्या नजरेआड करशील. आणि तुझ्या वियोगाच्या दुःखानं मी मरीन!"

पण व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी त्याचे म्हणणे मुळीच ऐकेना. पूर्वीपेक्षाही जास्त आग्रहाने ती त्याच्या विनवण्या करू लागली. पृथ्वीवरील कोणताही भयानक राक्षस तिला घाबरवू शकणार नाही आणि तिचे आपल्या दयाळू धन्यावरील प्रेम कधीच कमी होणार नाही, असे खात्रीपूर्वकपणे ती त्याला सांगू लागली.

जंगलचा प्राणी, सागरनिवासी, खूप खूप काळपर्यंत तिच्या विनवण्यांना विरोध करीत राहिला. शेवटी तिचे मन मोडणे त्याला अशक्य ठरले. तिचे अश्रू त्याला पाहवेनात. तो तिला म्हणाला:

"मी तुझ्या इच्छेविरुद्ध वागू शकत नाही, कारण स्वतःपेक्षाही मी तुझ्यावर जास्त प्रेम करतो. माझं सुख नष्ट होईल आणि मला अकाली मरण येईल हे मला माहीत आहे. पण तरीही मी तुझी इच्छा पूर्ण करतो. जंगलामागं सूर्य मावळतीला जाईल आणि धूसर संध्याप्रकाश पडेल तेव्हा बागेत ये आणि म्हण: 'विश्वासू मित्रा, दाखव स्वतःला!' मग मी तुला माझा भयानक चेहरा आणि ओंगळ शरीर दाखवीन. नंतर जर तुझी इथं रहायची इच्छा नसेल, तर अखंड छळवादात तुला जबरदस्तीने मी डांबून ठेवणार नाही. माझी सोनेरी अंगठी तुझ्या झोपायच्या खोलीत तुझ्या उशीखाली तुला सापडेल तुझ्या उजव्या हाताच्या करंगळीत ती घाल, म्हणजे ताबडतोब तू तुझ्या प्रिय वडिलांच्या घरात पोहोचशील. त्यानंतर कधीही माझ्याबद्दल काहीही ऐकणार नाहीस!"

व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी मुळीच दचकली नाही, मुळीच भेदरली नाही. तिचा निश्चय पक्का होता. अजिबात न डगमगता, ठरल्या वेळी, ठरल्या जागी जाऊन वाट पहात ती उभी राहिली. जेव्हा सूर्य जंगलापलिकडे मावळला आणि धूसर संधिप्रकाश पसरला, तेव्हा तिने साद घातली: "माझ्या विश्वासू मित्र, दाखव स्वतःला!" जंगलच्या



प्राण्याने, सागरनिवासीने, दूर अंतरावरूनच तिला आपले दर्शन दिले. पाऊलवाटेने तो चालत आला आणि पटकन झुडुपात गुडुप्प झाला. पण व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण मुलीने त्याला पाहिले. आपले कमळासारखे सुंदर हात तिने हलविले, एक किंकाळी फोडली व रस्त्यात ती बेशुद्ध पडली.

व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी किती काळ बेशुद्ध पडली होती कुणास ठाऊक! पण जेव्हा ती शुद्धीवर आली तेव्हा जवळच कुणीतरी हमसून हमसून रडत, हुंदकत असल्याचे तिने ऐकले. कुणीतरी केविलवाण्या आवाजात म्हणत होते:

"माझ्या सुंदर प्रिये, तू माझ्या नाश केलास! तुझा सुंदर मुखडा यापुढं मला दिसणार नाही. माझ्या कर्कश्य आवाजाचा यापुढं तुला त्रास सहन करावा लागणार नाही. आता अकाली मरण्याची माझी घटका आली!"

तिला वाईट वाटले, स्वतःची लाज वाटली. आपल्या भीतीवर तिने कसाबसा ताबा मिळविला आणि खंबीर आवाजात ती म्हणाली:

"छेः छेः, माझ्या दयाळू आणि प्रेमळ धन्या, घाबरू नकोस. तुझ्या प्रचंड देहाची मला पुन्हा कधीही भीती वाटणार नाही. मी तुझ्यापासून दूर जाणार नाही किंवा तुझा चांगुलपणाही विसरणार नाही. आता पुन्हा एकदा तू आपल्या पूर्वीच्या रूपात माझ्यासमोर उभा रहा. ती केवळ पहिली खेप होती म्हणून मी घाबरले."

जंगलचा प्राणी, सागरनिवासी, आपल्या हिडीस, भयानक रूपात तिच्यासमोर उभा राहिला. तिने त्याला कितीही बोलाविले तरी तिच्या जवळ जाण्याचा धीर मात्र त्याला झाला नाही. दुसऱ्या दिवशी सकाळी, तेजस्वी सूर्यप्रकाशात जेव्हा तिने जंगलचा प्राणी, सागरनिवासी, प्रथम पाहिला तेव्हा जरा ती दचकलीच. पण तिने आपण घाबरल्याचे दाखविले नाही. लौकरच तिच्या मनातील भीती गेली. आता पूर्वीपेक्षा अधिक मोकळे-पणाने त्यांच्या गप्पा होऊ लागल्या. सबंध दिवसभर ती दोघे एकत्र होती. दोन्ही वेळा त्यांनी भरपूर भोजन केले, मधुर पेयांचे प्राशन केले. मग बागांमधून त्यांनी भटकंती केली आणि बिनघोडयाच्या गाडीमधून जंगलातून रपेट मारली.



असा बराच काळ लोटला. प्रत्यक्ष कृती घडण्यापेक्षा गोष्ट खूप लौकर सांगता येते. एके रात्री व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण मुलीला स्वप्नात दिसले की, तिचे वडील खूप आजारी पडले होते. तिला कमालीचे दु:ख झाले. जंगलच्या प्राण्याने, सागरनिवासीने, जेव्हा तिचे दु:ख आणि अश्रू पाहिले तेव्हा तोसुद्धा कष्टी झाला. त्याने तिच्या दु:खाचे आणि अश्रूंचे कारण विचारले. तिने आपले स्वप्न त्याला सांगितले व आपल्या प्रिय वडिलांना आणि बहिणींना भेटण्याची त्याच्यापाशी परवानगी मागितली. जंगलचा प्राणी, सागरनिवासी, तिला म्हणाला:

"माझ्या परवानगीची तुला काय गरज? तुझ्यापाशी सोन्याची अंगठी आहे. तुझ्या उजव्या हाताच्या करंगळीत ती घाल, म्हणजे ताबडतोब तुझ्या वडिलांच्या घरात पोहोचशील. तुला पाहिजे तेवढा वेळ तिथं रहा. पण मी मात्र तुला सांगतो: जर तीन दिवस आणि तीन रात्रींनंतर तू परतली नाहीस, तर ह्या पृथ्वीवर मी तुला सापडणार नाही. मी तात्काळ मरून जाईन, कारण स्वत:पेक्षाही माझं तुझ्यावर जास्त प्रेम आहे आणि तुझ्याशिवाय मी राहू शकत नाही."

तिने त्याला आश्वासने आणि वचने द्यायला सुरुवात केली की, तीन दिवस आणि तीन रात्रींची मुदत पुरी होण्यापूर्वी बरोब्बर एक तास आधी ती त्याच्या राजवाड्यात परत येईल. आपल्या प्रेमळ आणि उमद्या धन्याचा निरोप घेऊन तिने उजव्या हाताच्या करंगळीत अंगठी घातली. दुसऱ्याच क्षणी ती व्यापाऱ्याच्या घराच्या प्रशस्त आवारात, आपल्या वडिलांच्या घरात, दाखल झाली.

खूप वेळपर्यंत त्यांनी एकमेकांची चुंबने आणि आलिंगने घेतली. जंगलच्या प्राण्याच्या, सागरनिवासीच्या घराबद्दल, तेथील आपल्या आयुष्याबद्दल, तिने वडिलांना आणि बहिणींना सारी सारी माहिती सांगितली. तिच्या वैभवसंपन्न आणि राजेशाही थाटाच्या आयुष्याबद्दल व्यापाऱ्याला खूप आनंद झाला. जंगलच्या प्राण्याला, सागरनिवासीला, ती अजिबात भीत नव्हती याचे त्याला नवल वाटले. जंगलच्या प्राण्याच्या नुसत्या आठवणीने त्याला अजूनही कापरे भरत होते. पण मोठ्या दोघा बहिणींना मात्र छोटीचा मत्सर वाटला.



छोटी खूप वैभवात रहात होती आणि तिचा मालक जणू तिच्या दासाप्रमाणे वागत होता हे ऐकून त्यांना असूया वाटली.

तो दिवस एखाद्या तासासारखा सरला. दुसरा दिवस एखाद्या मिनिटासारखा पसार झाला. तिसऱ्या दिवशी मोठ्या दोघी बहिणी धाकटीचे मन वळवू लागल्या की, तिने जंगलच्या प्राण्याकडे, सागरनिवासीकडे मुळीच परत जाऊ नये. "मरू दे त्याला. त्याची तीच लायकी आहे..." मोठ्या दोघी बहिणी म्हणाल्या. पण छोटीला आपल्या बहिणींच्या बोलण्याचा राग आला. ती म्हणाली :

"माझ्या भल्या आणि उमद्या मालकाच्या एकूण दयाळूपणाची आणि असीम प्रेमाची परतफेड जर मी कृतघ्नपणाने केली आणि त्याच्या मरणाला कारण ठरले, तर ह्या जगात जिवंत राहण्याच्या मी लायकीची नाही. जंगली जनावरांनी मला फाडून माझा फडशा पाडावा!"

प्रामाणिक व्यापाऱ्याने, तिच्या वडिलांनी, तिचे ह्या उदात्त बोलण्याबद्दल कौतुक केले. असे पक्के ठरले की, जंगलच्या प्राण्याकडे, सागरनिवासीकडे, त्याच्या सुंदर, तरुण, सर्वांत धाकट्या मुलीने ठरलेल्या मुदतीच्या आधी एक तास परतावे. पण मोठ्या दोघी बहिणींना हे पसंत नव्हते. त्यांनी एक दुष्ट कावा रचला. घरामधील सर्व घड्याळे त्यांनी एक तास मागे केली.

जेव्हा जाण्याची खरी वेळ झाली तेव्हा व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण, धाकट्या मुलीच्या छातीत वेदना सुरू झाल्या. आपल्या वडिलांच्या सर्व घड्याळांकडे — इंग्लिश आणि जर्मन बनावटीच्या — ती सतत पाहू लागली. पण तिच्या प्रवासाला अजून एक तास अवकाश असल्याचे सर्व घड्याळांचे काटे दाखवीत होते. हा सारा वेळ तिच्या मोठ्या दोघी बहिणी तिच्याशी काही ना काही निमित्त काढून बोलत होत्या, तिला अडवून ठेवू पहात होत्या. सरतेशेवटी छोटीला राहवेना. व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण, धाकट्या मुलीने आपल्या प्रिय वडिलांचा निरोप घेतला, आपल्या बहिणींचा निरोप घेतला आणि ठरल्या मुदतीच्या आधी एक मिनिट सोन्याची अंगठी आपल्या उजव्या हाताच्या करंगळीत घातली. दुसऱ्याच



क्षणी ती जंगलच्या प्राण्याच्या, सागरनिवासीच्या, राजवाड्यात दाखल झाली. तो आपल्याला भेटायला का आला नाही याचे तिला आश्चर्य वाटले व मोठ्यांदा तिने हाक मारली :

"माझ्या उमद्या धन्या, माझ्या विश्वासू मित्रा, तू कुठं आहेस? मला भेटत का नाहीस? ठरल्या मुदतीपेक्षा मी तब्बल एक तास आणि एक मिनिट आधी आले आहे."

पण तिला काहीच उत्तर मिळाले नाही. तिच्या स्वागताचे शब्द उमटले नाही. स्मशानशांतता पसरली होती. व्यापाऱ्याच्या मुलीला हे अनिष्टसूचक वाटले. ती झटदिशी गवताळ टेकाडाकडे धावली, जेथे तिचे आवडते छोटे शेंदरी फूल उगवलेले होते. तेथे तिला दिसले की, आपल्या बेढब पंजांमध्ये ते शेंदरी फूल धरून जंगलचा प्राणी, सागरनिवासी, टेकाडावर पडला होता. प्रथम तिला वाटले की, तिची वाट पाहता पाहता त्याला गाढ झोप लागली असावी.

प्रथम व्यापाऱ्याच्या सुंदर, तरुण मुलीने त्याला जागे करण्याचा प्रयत्न केला. पण त्याला तिचे बोलणे ऐकू गेले नाही. मग त्याचे केसाळ पंजे पकडून तिने त्याला जोराने गदागदा हलविले. तेव्हा तिच्या लक्षात आले की, जंगलचा प्राणी, सागरनिवासी, मरून पडला होता...

तिचे नितळ डोळे अंधुक बनले, तिचे गुलाबी पाय लटपटले आणि ती गुडघ्यांवर मटकन खाली बसली. आपल्या उमद्या धन्याच्या हिडीस, भयानक डोक्याभोवती तिने आपल्या कमलशुभ्र हातांची मिठी घातली आणि दुःखाने विव्हळली :

"माझ्या जिवलगा, ऊठ, जागा हो! माझ्या प्रियतमाप्रमाणे माझं तुझ्यावर प्रेम आहे!"

हे शब्द तिने उच्चारताच आकाशात सर्वत्र विजा कडाडल्या, धरणी हादरली, गवताळ टेकाडावर दगडी बाणाचा आघात झाला व व्यापाऱ्याची सुंदर, तरुण मुलगी बेशुद्ध होऊन जमिनीवर कोसळली. किती वेळपर्यंत ती बेशुद्ध होती कुणास ठाऊक! पण जेव्हा ती शुद्धीवर आली तेव्हा पांढऱ्या संगमरवरी दालनात रत्नजडित सोनेरी सिंहासनावर आपण बसल्याचे तिला आढळले. आणि एका तरुण, चित्रासारख्या देखण्या राजपुत्राने आपल्या बाहूंचा तिला विळखा घातला होता.



मस्तकावर राजमुकुट धारण केलेला तो देखणा राजपुत्र तिला म्हणाला :

"हे माझ्या निष्कलंक सुंदरी, माझ्या प्रेमळ काळजासाठी आणि तुझ्यावरील माझ्या प्रेमासाठी, तू माझ्यावर प्रेम केलंस. हिडीस राक्षसाच्या माझ्या रूपातही तू माझ्यावर प्रेम केलंस. आता माझ्या मानवी रूपात माझ्यावर प्रेम कर आणि माझी पत्नी हो! माझ्या दिवंगत वडिलांवर, त्या बलाढ्य राजावर, एका चेटकिणीचा राग होता. आपल्या जादूटोण्यानं तिनं मला माझ्या लहानपणीच भयानक राक्षसाचं रूप दिलं. तिनं मला शाप दिला होता की, जोपर्यंत एक सुंदर तरुणी – मग ती कोणत्याही कुळातील असो – माझ्या हिडीस राक्षस रूपात माझ्यावर प्रेम करीत नाही आणि माझी विवाहबद्ध पत्नी होण्याची इच्छा व्यक्त करीत नाही, तोपर्यंत मी ओंगळ, भयानक राक्षसरूपात राहणार होतो. अशी तरुणी मला भेटली म्हणजे मला पुन्हा मानवी रूप प्राप्त होणार होते. राक्षसरूपात मी पुरती तीस वर्षं राहिलो. माझ्या राजवाड्यात मी आत्तापर्यंत अकरा सुंदर तरुणींना मोहित करून आणलं होतं. तू बारावी. पण पूर्वीच्या एकाही तरुणीनं माझ्या प्रेमळपणावर आणि भलेपणावर प्रेम केलं नाही. पण तू मात्र माझ्या ओंगळ, हिडीस रूपातही माझ्यावर प्रेम केलंस. माझ्या प्रेमळपणावर, भलेपणावर, अंतःकरणाच्या दयाळूपणावर तू प्रेम केलंस. तुझ्याविषयीच्या माझ्या मूक प्रेमावर प्रेम केलंस. आता तू वैभवशाली राजाची पत्नी होशील, एका बलाढ्य साम्राज्याची राणी होशील!"



